**सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) साठी बाहय यंत्रणेकडून मासिक दराने वाहनचालक पुरविण्यासाठी दिनांक १.८.२०१४ ते ३०.६.२०१५ या कालावधीसाठी दरकरार करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्र. बावासे २०१४/प्र.क्र.६७/२४
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ७.८.२०१४

**संदर्भ-** १) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.पदनि २०१०/८४/विसु-१, दिनांक २७.९.२०१०
२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.पदनि २०१३/प्र.क्र.११/१३/विसु-१, दिनांक ०२.०२.२०१३

**प्रस्तावना** :-

सामान्य प्रशासन (खुद्द) विभागात वाहनचालकांची काही पदे रिक्त असल्याने तसेच वाहनचालकांच्या दीर्घ/किरकोळ रजेच्या कालावधीत विभागातील मुख्य सचिवासह इतर सचिवांना पर्यायी वाहनचालकांच्या सेवा सातत्याने पुरविणे गरजेचे असते. यास्तव सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) साठी बाहय यंत्रणेकडून मासिक दराने वाहनचालक पुरविण्यासाठी दिनांक १७.७.२०१३ च्या शासन निर्णयान्वये दिनांक १/७/२०१३ ते ३०/६/२०१४ या कालावधीसाठी दर करार करण्यात आला होता. सदर दरकरार संपुष्टात आल्यामुळे नव्याने निविदा मागविण्यांत आल्या होत्या. प्राप्त निविदा विभागीय निविदा छाननी समिती पुढे सादर केल्या. समितीने त्यामधील मे. कृष्णा मोटर्स, मुंबई या पुरवठादाराचे दर सर्वात न्यूनतम असल्याने ते स्विकृत करण्याची शिफारस केली.

**शासन निर्णय**:

सामान्य प्रशासन (खुद्द) िविभागाकरिता मासिक दराने वाहनचालक उपलब्ध करुन देण्यासाठी मे.कृष्णा मोटर्स, गोरेगांव(पुर्व), मुंबई या संस्थेची पुढील दर आणि अटी शर्तीनुसार नियुक्ती करण्यात येत आहे .

(अ) वाहनचालकांच्या वेतनाचा मासिक ठोक दर रु.१३,३५७/- राहील.

(ब) अतिकालिक भत्ता रु.४०/- प्रती तास. अतिकालिक भत्ता हा दिवसाच्या ९ तासाच्या काम संपल्यानंतर १ तास झाल्यानंतर म्हणजेच १० तासानंतर लागू होईल.

(क) मुंबई/ बृहन्मुंबई बाहेरील भत्ता रु.२५० -/राहील. तसेच देयक सादर करतांना त्यामध्ये ESIC व P.F. ची रक्कम भरणा करुन त्याप्रमाणे दर्शविण्यांत यावी .

(ड) वाहनचालकास साप्ताहीक सुट्टी रविवारची राहील. तसेच त्याला रविवारी सुट्टीच्या दिवशी कामावर बोलविल्यास त्या दिवसाकरिता मासिक ठोक दराच्या सरासरीने प्रतिदिन दराने वेतन अनुज्ञेय राहील.

(इ) कराराचा कालावधी दिनांक १.८.२०१४ ते ३०.६.२०१५ असा राहिल.

## सेवेच्या अटी व शर्ती

१. वाहनचालक किमान चौथी इयत्ता उत्तीर्ण व भारतीय नागरिक असावा. तसेच वाहनचालकास मराठी लिहिता/बोलता/वाचता येणे आवश्यक राहील.

१.१ वाहनचालकाची वैयक्तिक माहिती शासनाच्या मागणीनुसार पुरविण्यात यावी. (शैक्षणिक अर्हता, कायम व सध्याचा पत्ता, नमुना स्वाक्षरी व पासपोर्ट साईज फोटोग्राफ )

१.२ संबंधित वाहनचालकाची चारित्र्य तपासणी राजपत्रित अधिकाऱ्यांकडून करुन घेण्यात यावी व पोलीस पडताळणीसह आपल्या संस्थेचे ओळखपत्र देण्यात यावे.

१.३ वाहनचालकाच्या नियमित वेतन प्रदानाविषयी संस्थेने महिना पूर्ण झाल्यानंतर पहिल्या आठवडयात हजेरीपटासह कार्यपूर्ती अहवाल सादर करणे गरजेचे राहील.

१.४ आपल्या संस्थेमार्फत मागणी केलेल्या कालावधीसाठी वाहन चालक उपलब्ध होऊ शकत नसेल अशावेळी पर्यायी व्यवस्था मान्य अटींसह करण्यात यावी. अन्यथा दंडात्मक शुल्क आकारण्यात येईल.

१.५ वाहनचालकाच्या मार्फत होणाऱ्या शासकीय नुकसानाची जबाबदारी संबंधित संस्थेची राहील.

१.६ संस्थेमार्फत पुरविण्यात आलेले वाहनचालक विनम्र वागणूकीचे सहकारी वृत्तीचे, धडाडीचे असावे.

१.७ वैद्यकीय भत्ता/खर्चाची जबाबदारी संबंधित संस्थेची राहील.

१.८ शासकीय अधिकाऱ्यांच्या कामाच्या आवश्यकतेनुसार कार्यालयीन वेळेव्यतिरिक्त काम करणे आवश्यक राहील.

२. संस्थेतर्फे पुरविण्यात येणारा वाहनचालक गुन्हेगारी पार्श्वभूमीचा किंवा प्रवृत्तीचा नसावा.

३. वाहनचालकासोबत त्याचा वाहन चालविण्याचा परवाना, त्याचे ओळखपत्र (आधारकार्ड,निवडणूक कार्ड , पॅन कार्ड इत्यादीपैकी एक) त्याच्याजवळ असावे.

४. वाहनास अपघात झाल्यास व दुर्देवाने वाहन चालकास गंभीर स्वरुपात इजा झाल्यास वाहनचालकास वैद्यकीय खर्चाची अथवा नुकसान भरपाईचे कोणतेही दायित्व शासनाकडे असणार नाही. त्याची जबाबदारी संबंधीत संस्थेवर राहील

५. कंपनी/संस्थेतर्फे काम करणाऱ्या वाहनचालकाच्या सेवेचे कोणतेही उत्तर दायित्व शासनावर रहाणार नाही. (मुळ स्त्रोतातून कर,जीपीएफ,इपीएफ आणि सीपीएफ वजावट होणार नाही.)

६. वाहनचालकाचे वय ५८ वर्षापेक्षा जास्त आणि १८ वर्षापेक्षा कमी नसावे.

७. शासनाच्या आावश्यकतेनुसार वाहनचालकाची मागणी केली जाईल.

८. कराराचे पालन समाधानकारकपणे न झाल्यास करार केव्हाही संपुष्टात आणणे. तसेच कराराची मुदत वाढविणे याबाबतचा निर्णय शासनाचा राहील.

९. करारातील अटी व शर्ती मान्य असल्याबाबत व विहीत वेळेत वाहनचालक पुरविणेबाबत रुपये १००/- च्या स्टॅम्प पेपरवर करारनामा करुन देणे आवश्यक आहे. त्यानुसार वरील दोन संस्थाकडून करारनामा करुन घेतला आहे.

१०. वाहनचालक वाहन मध्येच सोडून गेल्यास त्या दिवसाचे वेतन देय होणार नाही.

११. शासकीय गोपनियता अबाधित राहील याची दक्षता संबधित संस्था घेईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४०८०७११२५२४२५४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SATISH SHANKAR GURAV

Digitally signed by SATISH SHANKAR GURAV
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SATISH SHANKAR GURAV
Date: 2014.08.11 10:51:42 +05'30'

( स. शं. गुरव )
**कार्यासन अधिकारी**

प्रत,

महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई
महालेखापाल ( लेखापरिक्षा ) मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी , मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
सामान्य प्रशासन विभागातील सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव
वित्त विभाग (वि.सु) / विनियम कार्यासन, मंत्रालय, मुंबई
मे. कृष्णा मोटर्स,गोरेगाव (पुर्व) मुंबई ४०० ०६५
सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग (सेवा), मंत्रालय, मुंबई-३२
उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (आस्थापना), मंत्रालय, मुंबई-३२
सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-२६ /कार्यासन-१९
निवडनस्ती